सुधारित प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत.- शेतकरी सहकारी सूतगिरणी धुळे व शिंदखेडा तालुका मर्या.सोनगीर (नगाव), जि. धुळे.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प १२२२/प्र.क्र.२६/टेक्स१ (ब)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२४.

<u>वाचा :-</u>

१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दि.११.०८.१९९३.
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दि.२४.३.१९९९.
३. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-१२००/प्र.क्र.१५३/टेक्स-१, दि.१३.६.२०००.
४. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१(अ), दि.३०.०६.२०११.
५. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२१५/प्र.क्र.७३/ टेक्स-१(अ), दि.३०.०१.२०१६
६. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१६/प्र.क्र.८१/टेक्स-१(अ), दि.१०.०७.२०१७.
७. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२१५/प्र.क्र.५०/ टेक्स-१ (अ), दि.१७.६.२०२१.
८. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२२३/प्र.क्र.८/ टेक्स-१ (ब), दि.२६.७.२०२३.
९. आयुक्त,वस्त्रोद्योग,नागपूर यांचे पत्र क्र कार्या-६(१) (सूतगि)/प्रकल्प/शेतकरी नगाव धुळे /१२७६/२०२४, दिनांक ०५.०३.२०२४.
१०.शासन पत्र, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: बैठक-१५२३/प्र.क्र.८०/टेक्स-१(अ), दिनांक ११.०३.२०२४. (सुकाणू समिती इतिवृत्त)
११. अट दुरुस्तीचा जीआर.११.३.२०२४

**प्रस्तावना :-**

शेतकरी सहकारी सूतगिरणी धुळे व शिंदखेडा तालुका मर्या.सोनगीर (नगाव), जि. धुळे या सूतगिरणीची नोंदणी दि.१२.०९.१९९० रोजी करण्यात आली असून तिचा नोंदणी क्रमांक डीटीए/पीआरजी/ए/डिएच-६ असा आहे. सूतगिरणीचे कार्यक्षेत्र धुळे व शिंदखेडा तालुक्यापूरते मर्यादित आहे. शासन निर्णय दिनांक १५.१०.१९९२ अन्वये सूतगिरणीचा आठव्या पंचवार्षिक योजनेत समावेश करुन शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली होती. शासनाने दि.३०.०६.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये, राज्यातील सहकारी सूतगिरण्यांच्या प्रकल्प अहवालाची सुधारीत किंमत रु.६१७४.२४ लाख इतकी निश्चित केली आहे. त्यानुसार शासन निर्णय दिनांक ०४.०९.२०१७ अन्वये शासनाने या सूतगिरणीच्या रु.५९०९.४८ लाख प्रकल्प किंमतीस मान्यता दिलेली आहे. सदर प्रकल्प अहवाल किंमतीनुसार सूतगिरणीस आत्तापर्यंत रु.१४०९.०४ लाख इतके शासकीय भागभांडवल अदा केलेले आहे.

२. शासन निर्णय दिनांक १७.०६.२०२१ अन्वये सहकारी सूतगिरणीची प्रकल्प किंमत रु.८०.९० कोटी इतकी निश्चित करण्यास मान्यता दिलेली आहे. तसेच, शासन निर्णय दिनांक २६.०७.२०२३ अन्वये सहकारी सूतगिरण्यांचा प्रकल्प अहवाल रु.८०.९० कोटीच्या मर्यादेत प्रो-रेटा पध्दतीने निश्चित करणेसाठी सुधारित कार्यपध्दती निश्चित करण्यात मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये दिनांक ११.३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. आयुक्त (वस्त्रोद्योग) यांनी दिनांक ५.३.२०२४ अन्वये सदर सूतगिरणीचा सध्याचे प्रकल्प अहवाल रु.८०९०.०० लाखाच्या मर्यादेत प्रो-रेटा पध्दतीने निश्चित करुन रुपये ७२४२.३७ लाख किंमतीचा सुधारित प्रकल्प अहवाल मान्यतेसाठी सादर केला आहे. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीच्या दि.०६.०३.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत शेतकरी सहकारी सूतगिरणी धुळे व शिंदखेडा तालुका मर्या.सोनगीर (नगाव), जि. धुळे या सूतगिरणीच्या सुधारित प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन रु. ७२४२.३७ लाख किंमतीचा प्रकल्प अहवालास अंतीम मान्यता अटीच्या अधीन राहून देण्याबाबतचा निर्णय झाला. त्यानुसार सदर सूतगिरणीचा प्रकल्प अहवाल सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शेतकरी सहकारी सूतगिरणी धुळे व शिंदखेडा तालुका मर्या.सोनगीर (नगाव), जि. धुळे या सूतगिरणीची सध्याची रु.५९०९.४८ लाख रक्कमेची प्रकल्प किंमत रु.८०९०.०० लाख किंमतीच्या मर्यादेत प्रो-रेटा नुसार रु. ७२४२.३७ लाख इतक्या रक्कमेच्या सुधारित प्रकल्प किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

अ) शेतकरी सहकारी सूतगिरणी धुळे व शिंदखेडा तालुका मर्या.सोनगीर (नगाव), जि. धुळे या सूतगिरणीने सध्याच्या मंजूर प्रकल्प अहवाल किंमतीनुसार उभारावयाची ५%

सभासद भागभांडवलाची रक्कम व प्रकल्पाच्या ५०% मुदती कर्जाची रक्कम उभारुन प्रकल्पावर खर्च केल्यानंतरच सूतगिरणीस सुधारित प्रकल्प अहवाल रुपये ७२४२.३७ लाख किंमतीच्या मर्यादेत देय असलेले उर्वरित शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येईल.

२. सदर सुतगिरणीवर खालील बाबी बंधनकारक राहतील.

१. सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.

२. शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.

३. सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

४. सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

५. सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच आयुक्त वस्त्रोद्योग,नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

६. सदर सूतगिरणी सर्वसाधारण प्रवर्गातील असल्याने शासनाने भविष्यात काही अटी/शर्ती घातल्यास त्या या सूतगिरणीवर बंधनकारक असतील.

७. दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

३. या सूतगिरणीचे सभासद भागभांडवल व शासकीय भागभांडवल यांचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने सुधारित प्रकल्प अहवालानुसार पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करावयाचा आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशिल | प्रकल्प किंमतीनुसार उभारावयाची रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | सभासद भाग भांडवल (५%) | ३६२.११ |
| २ | शासकीय भागभांडवल (४५%) | ३२५९.०६ |
| ३ | दीर्घ मुदती कर्ज (५०%) | ३६२१.१९ |
| | एकूण | ७२४२.३७ |

४.	या सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्यामर्यादेत या सूतगिरणीने खर्च करणे सूतगिरणीस बंधनकारक राहील.

| अ. क्र. | तपशील | मंजूर प्रकल्प अहवाला प्रमाणे तरतूद | दि. ३१/३/२०२३ अखेर विनियोग दाखल्या नूसार खर्च केलेली रक्कम | प्रत्यक्ष पाहणी प्रमाणे लागणारी अपेक्षित रक्कम (As per Old DPR) | प्रकल्प अहवाल किंमत रू.८०.९० कोटी | नवीन प्रकल्प अहवाला नूसार लागणारा अपेक्षित खर्च | प्रोरेटा पध्दतीने निश्चित झालेला सुधारीत प्रकल्प अहवाल किंमत |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८=(५+७) |
| १ | जमीन व जमीन सुधारणा | ५८.०६ | ३६.९८ | २१.५० | १७२.०० | ६१.६२ | ८३.३९ |
| २ | फॅक्टरी इमारत व इतर बांधकम | १००१.३९ | ७३५.५४ | ६३२.४३ | १९०८.४५ | ५७२.५४ | १२०४.९६ |
| ३ | प्लँट अँड मशिनरी | ३१०२.७८ | १४०.२२ | ०.० | ४०६७.२९ | ४०६६.१६ | ४०६६.१६ |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ८०६.५० | ४७.९५ | ०.०० | ९११.०० | ८५६.३४ | ८५६.५४ |
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ६१.०० | ०.०० | ०.० | ८८.८७ | ८८.८७ | ८८.८७ |
| ६ | प्रि ऑपरेटिव्ह खर्च | २०८.१६ | १३४.९८ | १३५.३० | १८७.०० | ६५.४५ | १८७.०० |
| ७ | मार्जिन मनी | ४१०.१७ | ०.०० | ०.० | ४११.१२ | ४११.१२ | ४११.१२ |
| ८ | कॉन्टीजंसी | २६१.५० | ०.०० | ०.० | ३४४.३३ | ३४४.३३ | ३४४.३३ |
|  | एकूण | ५९०९.४८ | १०९४.६७ | ७८९.३५ | ८०९०.०० | ६४६६.७३ | ७२४२.३७ |

५.	सूतगिरणीने रु. ७२४२.३७ लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास जास्तीची रक्कम सूतगिरणीने स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील. प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूतगिरणीला स्वत: करावा लागेल. तसेच यंत्रसामुग्री खरेदी व स्थापत्य बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ नुसार मान्यता

घ्यावी. सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१६१६०२०८४८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

CHITRA RAVINDRA BISEN

Digitally signed by CHITRA RAVINDRA BISEN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f789a84db3cd4420e2db86c40df943d84a7873bde6b53430a5e3b150b091368e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0BD6EA041CD6F49090B004C64DAAE9708BF029C76F9B139C454C2A8EA66C7EA3, cn=CHITRA RAVINDRA BISEN
Date: 2024.03.16 16:11:45 +05'30'

(चित्रा बिसेन)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, नागपूर.
७. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर.
८. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, नागपूर.
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई-०१.
१०. कार्यासन अधिकारी १६-सी / १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत).
१२. अध्यक्ष, शेतकरी सहकारी सूतगिरणी धुळे व शिंदखेडा तालुका मर्या.सोनगीर (नगाव), जि. धुळे.
१३. निवडनस्ती (टेक्स १ (अ)/(ब))